मागासवर्गीय प्रवर्गातील अधिकारी व कर्मचारी यांच्या पदोन्नतीतील आरक्षणासंदर्भात निर्णय घेण्यासाठी मंत्रिगटाची स्थापना करण्याबाबत..

# महाराष्ट्र शासन

**सामान्य प्रशासन विभाग,**

**शासन निर्णय क्र. बीसीसी-२०२०/प्र.क्र.३२६ अे/१६-ब**

**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,**

**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२**

**दिनांक : २८ ऑक्टोबर, २०२०**

वाचा:- शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. बीसीसी २००१/१८८७/प्र.क्र.६४/०१/ १६-ब , दि. २५ मे २००४

**प्रस्तावना :**

मा. उच्च न्यायालय ,मुंबई यांनी रिट याचिका क्र. २७९७/२०१५ , महाराष्ट्र राज्य विरुद्ध श्री. विजय घोगरे व इतर या प्रकरणी दि. ४ ऑगस्ट, २०१७ रोजी पदोन्नतीमधील आरक्षण अवैध ठरवून पदोन्नतीमध्ये आरक्षणाची तरतूद असणारा संदर्भाधिन दि.२५ मे,२००४ चा शासन निर्णय रद्द केला आहे.राज्य शासनाने त्याविरूद्ध मा.सर्वोच्च न्यायालयात विशेष अनुमती याचिका क्र.२८३०६/२०१७ दाखल केली असून सध्या ती प्रलंबित आहे.त्याअनुषंगाने पदोन्नतीमधील आरक्षणासंदर्भात निर्णय घेण्यासाठी मंत्रीगटाची स्थापना करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.त्यानुसार शासनाने खालीलप्रमाणे मंत्रीगटाची स्थापना करण्याचा निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय:**

मागासवर्गीय अधिकारी व कर्मचारी यांच्या पदोन्नतीमधील आरक्षणासंदर्भात निर्णय घेण्यासाठी खालीलप्रमाणे मंत्रीगटाची स्थापना करण्यात येत आहे-

| अ.क्र. | सदस्य | पद |
|---|---|---|
| १ | श्री.अजित पवार,उप मुख्यमंत्री | अध्यक्ष |
| २ | श्री.छगन भुजबळ,मंत्री | सदस्य |
| ३ | श्री.जयंत पाटील,मंत्री | सदस्य |
| ४ | डॉ.नितिन राऊत,मंत्री | सदस्य |
| ५ | श्रीमती वर्षा गायकवाड,मंत्री | सदस्य |
| ६ | श्री.एकनाथ शिंदे,मंत्री | सदस्य |
| ७ | श्री.विजय वडेट्टीवार,मंत्री | सदस्य |
| ८ | श्री.संजय राठोड,मंत्री | सदस्य |
| ९ | ॲड. के.सी.पाडवी,मंत्री | सदस्य |
| १० | ॲड.अनिल परब,मंत्री | सदस्य |
| ११ | श्री.शंकरराव गडाख,मंत्री | सदस्य |
| १२ | श्री.धनंजय मुंडे,मंत्री | सदस्य |
| १३ | सचिव (साविस) , सामान्य प्रशासन विभाग , मंत्रालय , मुंबई. | सदस्य सचिव |

२. **सदर मंत्रिगटाची कार्यकक्षा पुढीलप्रमाणे राहील :-**

(१) पदोन्नतीतील आक्षणासंदर्भात मा.सर्वोच्च न्यायालयात राज्य शासनाची बाजू भक्कमपणे मांडण्यासाठी विशेष विधिज्ञांची नेमणूक करणे तसेच व इतर आरक्षण या विषयातील माहितीगारांशी विचारविनियम करणे.

(२) समिती मार्फत सदर न्यायालयीन प्रकरणाच्या प्रगतीचा वेळोवेळी आढावा घेणे.

(३) सर्व संबधित अधिकाऱ्यांना योग्य ते मार्गदर्शन व निर्देश देणे.

(४) सदर प्रकरणी सद्यस्थिती अहवाल अवलोकनार्थ सादर करणे

(५) विशेष अनुमती याचिका क्र.२८३०६/२०१७ वरील मा.सर्वोच्च न्यायालयाच्या निर्णयाच्या अधिन राहून मागासवर्गीयांना पदोन्नतीमध्ये आरक्षण देता येईल किंवा कसे याची तपासणी करणे

(६) विशेष अनुमती याचिका क्र.२८३०६/२०१७ मध्ये मा.सर्वोच्च न्यायालयाने राज्य शासनाच्या विरोधात निर्णय दिल्यास मागासवर्गीयांना पदोन्नतीमध्ये आरक्षण देण्यासाठी कर्नाटक शासनाच्या धर्तीवर राज्यात नविन कायदा करण्यासाठी कार्यवाही करणे

३. सदर मंत्रीगट आपल्या शिफारशी विहीत पद्धतीने मंत्रिमंडळास सादर करेल.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२०१०२८१२२११५४४०७ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Rasik Ambadas Khadse

Digitally signed by Rasik Ambadas Khadse
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fdc00fa9bc45e4f7281973d193127b8989dfa5df6a7a694b005e562ebd5c840e, serialNumber=a47200a14b42f151489f73f3e47c9e8733991629b2302a3831b945146be88a80, cn=Rasik Ambadas Khadse
Date: 2020.10.28 12:22:46 +05'30'

**(र.अं.खडसे)**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव,
२) मा. मुख्यमंत्री यांचे सचिव,
३) मा. मुख्य सचिव , महाराष्ट्र राज्य
४) मा. मंत्री (सामाजिक न्याय) यांचे खाजगी सचिव,
५) मा. राज्यमंत्री (सामाजिक न्याय ) यांचे खाजगी सचिव,
६) विरोधी पक्षनेते, विधानसभा, विधान भवन, मुंबई
७) विरोधी पक्षनेते, विधान परिषद, विधान भवन मुंबई
८) सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय,मुंबई
९) सचिव, विधी व न्याय विभाग, मंत्रालय,मुंबई

१०) सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय,मुंबई
११) सचिव, वि.जा.भ. ज. व ईमाव, विमाप्र कल्याण विभाग मंत्रालय, मुंबई
१२) सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग यांचे वरिष्ठ स्वीय सहायक
१३) महासंचालक, बार्टी, पुणे
१४) उपसचिव १६ ब सामान्य प्रशासन विभाग , मंत्रालय, मुंबई .
१५) निवड नस्ती ( मावक)